**मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई, अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. सीओएन २०२४/प्र.क्र.२६/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २८ मार्च, २०२४.

**संदर्भ :** १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. सीओएन-२०२३/प्र.क्र.९२/प्रशासन-१ दि. ०९ ऑक्टोबर, २०२३
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि. २१ फेब्रुवारी, २०२४
३) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे दि. १३ मार्च, २०२४ रोजीचे पत्र.
४) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई यांचे दि. १३ फेब्रुवारी, २०२४ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई व अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अस्थायी पदे दि. ०१ सप्टेंबर, २०२३ ते दि. २९ फेब्रुवारी, २०२४ पर्यंत चालू ठेवण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील नियमित अस्थायी आस्थापनेवरील १७ पदे व अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील **नियमित अस्थायी आस्थापनेवरील ०८ पदे अशी एकूण २५ पदे** सोबत दर्शविलेल्या विवरणपत्रानुसार सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत, या अटीच्या अधीन राहून **दिनांक ०१ मार्च, २०२४ पासून दिनांक ३१ ऑगस्ट, २०२४** पर्यंत चालू ठेवण्यास शासन मंजुरी देत आहे.

३. या बाबीवरील खर्च मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई व अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई या कार्यालयातील पदांसाठी " २०५९ - सार्वजनिक बांधकामे ८० - सर्वसाधारण, ००१ - संचालन व प्रशासन (चार) पर्यवेक्षण (योजनेतर) व विभाग / उपविभागांतर्गत पदांसाठी २०५९ - सार्वजनिक बांधकामे, ८० - सर्वसाधारण - ००१ - संचालन व प्रशासन (पाच) कार्यान्वयन (योजनेतर)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक पदनि २०१६/ प्र.क्र.८/ १६/आ.पु.क., दि. २१ फेब्रुवारी, २०२४ या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२८१७३५०९५५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDEEP SAHADEO REWALE

Digitally signed by SUDEEP SAHADEO REWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=41570e676233403355caab8cc6f4cb08480e2e80c6afc2b733ca211905e1d434, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B5B2DA9CB10BA8C6D55247B5E56FE2206FFE50CB862E223A178F18C4C5BF7C34, cn=SUDEEP SAHADEO REWALE
Date: 2024.03.28 17:44:54 +05'30'

**( सुदीप सहदेव रेवाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,** १) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
२) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई

**प्रत :-** १) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-२ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) लेखा व अधिदान कार्यालय, मुंबई.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड/पुणे/औरंगाबाद/नागपूर.
५) वित्त विभाग कार्यासन (व्यय-११) / (आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी, सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती

**विवरणपत्र (१) नियमित अस्थायी आस्थापनेवरील पदे**

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | दि.२९/०२/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांची संख्या. | दि.२९/०२/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली वाढ. | दि.२९/०२/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली घट | दि.०१/०३/२०२४ पासून दि.३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ द्यावयाच्या पदांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई | १७ | ० | ० | १७ |
| २ | अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सा.बां. विभाग, नवी मुंबई | ०८ | ० | ० | ०८ |
| | **एकूण** | **२५** | **०** | **०** | **२५** |